महाराष्ट्र शासन

क्र.आयएसटी-२०१२/प्र.क्र.४३०/उद्योग-३
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १० ऑगस्ट, २०१७

वाचा : १) शासन आदेश क्र.आयएसटी-२०११/प्र.क्र.१४८/उद्योग-३, दि.२६.०६.२०१२
२) अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, औरंगाबाद यांचे पत्र क्र. अजप्रतसऔ/ सेवा/का.४/२६७९/२०१५, दि.२८.०७.२०१५

## कार्यालयीन आदेश

श्री.गो.रा.जांगडा यांची अनुसूचित जमातीसाठी राखीव असलेल्या प्रवर्गातून उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील उद्योग अधिकारी, या पदावर शासन आदेश दि.२९ मार्च, १९७९ अन्वये नियुक्ती झाली होती. त्यानुषंगाने श्री.गो.रा.जांगडा यांना जात प्रमाणपत्र व जात वैधता सादर करण्याबाबत वारंवार सूचना देऊनही त्यांनी कोणताही प्रतिसाद दिलेला नाही. त्यानंतर श्री.जांगडा यांनी दि.२६.०८.२०११ अन्वये अनुसूचित जमाती प्रवर्गाच्या समर्थनार्थ कार्यकारी दंडाधिकारी, तहसिल कार्यालय, परभणी यांचे पत्र क्र.७७-संकीर्ण ८३२ कावि, दि.३१.०५.१९७७ अन्वये निर्गमित केलेले "गौंड" या जमातीचे प्रमाणपत्र सादर केले, तथापि, जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नाही. श्री.गो.रा.जांगडा यांची शासन सेवेतील नियुक्ती दि.१५ जून, १९९५ पूर्वीची असल्यामुळे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२४.०६.२००४ व शासन निर्णय दि.३०.०६.२००४ मधील तरतुदीनुसार शासन सेवेत संरक्षण मिळण्यासाठी, ते अनुसूचित जमातीचे नसल्यास ज्या मागास प्रवर्गाचे आहेत, त्या मागास प्रवर्गाचे जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे. याबाबत त्यांना वेळोवेळी सूचना देण्यात आल्या तसेच त्यांच्याशी सन २००८ पासून करण्यात आलेल्या पत्रव्यवहारास श्री.जांगडा यांनी कोणताही प्रतिसाद दिला नसल्याने त्यांना उक्त वाचा येथील क्र.१ च्या आदेशान्वये तात्काळ प्रभावाने शासन सेवेतून कार्यमुक्त करण्यात आले आहे.

२. सदर आदेशाविरोधात श्री.जांगडा यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र. ६४६/२०१२ दाखल केला असता श्री.जांगडा यांना सेवेतून कार्यमुक्त करण्याचे शासनाचे दि.२६.०६.२०१२ चे आदेश रद्दबादल केले तसेच अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांना त्यांचा जातीचा दावा निकालाच्या दिनांकापासून ३ महिन्यामध्ये निकाली काढण्याचे निदेश दिले. मा.न्यायाधिकरणाच्या आदेशानुसार अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांनी श्री.जांगडा हे "Gond" या अनुसूचित जमातीचे नसून ते "Khati" या जातीचे आहेत व श्री.जांगडा यांनी सदर माहिती अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती औरंगाबाद यांच्या दक्षता पथकाला दि.२३.०५.२०१५ रोजीच्या जबाबामध्ये दिली. तसेच श्री.जांगडा यांना "Gond" या अनुसूचित जमातीचे कोणतेही रीतीरिवाज, चालिरिती व रुढी परंपरा माहित नसल्याचे मान्य केले आहे. त्यामुळे श्री.जांगडा हे "Gond" या अनुसूचित जमातीचे नसल्याचे सिध्द झाले असल्याकारणाने अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, औरंगाबाद यांनी श्री.जांगडा यांचा "Gond" अनुसूचित जमातीचा दावा अवैध असल्याबाबत दि.१०.०७.२०१५ रोजी निर्णय दिला आहे. सदरचा निर्णय वाचा येथील क्र.२ अन्वये शासनास प्राप्त झाला.

३. श्री.जांगडा यांच्या प्रकरणी मा.न्यायाधिकरणाने दिनांक १८.०३.२०१५ रोजी पारित केलेल्या आदेशामध्ये "(iv) In case, the order of the Scrutiny Committee is adverse to the applicant's interest, **necessary consequence in law would follow.**" नमूद केले आहे. श्री.गोपीकिशन रामचंद्र जांगडा यांचा "गोंड (अ.ज.)" प्रवर्गाचा दावा अवैध असल्याचा निर्णय अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, औरंगाबाद यांनी वाचा येथील क्र.२ अन्वये दिला असल्याने ते अनुसूचित जमाती या प्रवर्गाचे नसल्याचे सिध्द झाले आहे. सदर निर्णयास श्री.जांगडा यांनी मा.उच्च न्यायालयात आव्हान दिलेले नाही.

४. उपरोक्त पार्श्वभूमी लक्षात घेता, श्री.गोपीकिशन रामचंद्र जांगडा यांनी अनधिकृतपणे अनुसूचित जमाती या प्रवर्गाचे शासकीय सेवेचे सर्व लाभ शासनाची फसवणुक करुन घेतल्याचे स्पष्ट होत आहे. यास्तव "महाराष्ट्र अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग (जातीचे प्रमाणपत्र देण्याचे व त्यांच्या पडताळणीचे विनियमन) अधिनियम, २०००" मधील कलम १० (२) च्या तरतुदीनुसार श्री.जांगडा यांनी त्यांच्या मूळ नियुक्तीच्या दिनांकापासून घेतलेले सर्व वित्तीय लाभ जमीन महसूलाच्या थकबाकीप्रमाणे तात्काळ वसूल करण्यात यावे. तसेच मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र.८९२८/२०१५ मध्ये दिलेल्या दिशानिर्देशाप्रमाणे श्री. जांगडा यांचे विरुध्द उक्त अधिनियमाच्या कलम ११ प्रमाणे फौजदारी गुन्हा दाखल करण्याबाबतची कार्यवाही विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई तात्काळ यांनी करावी. सदर प्रकरणी केलेल्या कार्यवाहीचा अनुपालन अहवाल तातडीने शासनास सादर करावा.

५. सदरचे आदेश आदिवासी विकास विभागाकडील अनौ.संदर्भ क्र.२७/२०१६/का.१०, दि.२९.६.२०१६, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडील अनौ. संदर्भ क्र.३/मावक, दि.३०.३.२०१७ व सामान्य प्रशासन विभागाकडील अनौ.संदर्भ क्र.१०१ अे/१६-ब, दि.१८.४.२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८१०१७३२१४००१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Namdeo Kondiba Bhosale

Digitally signed by Namdeo Kondiba Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=IEL Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, serialNumber=8c6a286229ecc7982a08553f49d547ef64be25c7f26fc96324ece7cccbfeb8c5, cn=Namdeo Kondiba Bhosale
Date: 2017.08.10 17:22:15 +05'30'

**(डॉ.ना.कों.भोसले)**
शासनाचे उप सचिव

**प्रति :**

श्री.गो.रा.जांगडा, तत्का.अधिक्षकीय उद्योग अधिकारी, जिल्हा उद्योग केंद्र, कोल्हापूर

**प्रत :**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) महाराष्ट्र १/२
२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई
३. उद्योग सहसंचालक, विभागीय कार्यालय, पुणे
४. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, कोल्हापूर

५. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
६. उप सचिव (१६-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती (उद्योग-३)